**महाराष्ट्र राज्याच्या वेबसाईटसाठी**
**कन्सलटींग एजंसी नियुक्त करण्यासाठी**
**समिती स्थापन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सा.प्र.वि. शासन निर्णय: क्र डब्ल्युईबी/२००१/प्रक्र१८/२००१/३९**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक: १८ जून, २००१.**

**वाचा:-१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक**
**डब्ल्युईबी/२००१/प्रक्र२७६/९९/३९,दि. २५.१.२०००.**
**२) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग क्रमांक: सीओएम**
**१०९९/प्रक्र १०५/९९/३९, दि. ३०.३.२००१.**

**प्रस्तावना:-**

राज्य शासनाच्या कामकाजाचे सर्वांगीण संगणकीकरण करण्याचा कार्यक्रम राज्य शासनाने हाती घेतला असून शासकीय कामकाजाचे संगणकीकरण करुन इंटरनेटच्या माध्यमाद्वारे शासकीय सेवा जनतेपर्यंत पोचविण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. शासनाने आपली अधिकृत वेबसाईट www.maharashtra.gov.in दि. १.५.१९९८ पासून इंटरनेटवर सुरु केली आहे. ही वेबसाईट विकास आयुक्त, उद्योग व महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय यांच्या संयुक्त विद्यमाने तयार करण्यात आलेली असून जानेवारी २००० पासून महाराष्ट्राच्या या वेबसाईटचे व्यवस्थापन माहिती तंत्रज्ञान संचालनालयाकडे सोपविण्यात आलेले आहे. महाराष्ट्र शासनाच्या सदर वेबसाईटचा विकास, देखभाल व व्यवस्थापन यासाठी कन्सलटींग एजन्सी नियुक्त करण्यासंदर्भातील संबंधीत बाबींची तपासणी करण्यासाठी एक समिती स्थापन करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबतीत उच्चाधिकार समितीच्या कार्यकारी समितीच्या बैठकीमध्ये दि. ७ एप्रिल २००१ रोजी सविस्तर चर्चा होऊन सदर कन्सलटींग एजन्सी नियुक्त करण्यासंदर्भासाठी खालील प्रमाणे एक समिती स्थापन करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र शासनाच्या अधिकृत वेबसाईटची संकल्पना व दिशा ठरविणे, वेबसाईट विकास, देखभाल आणि व्यवस्थापन करणे यासाठी राज्य स्तरीय कन्सलटींग एजन्सी नियुक्त करण्यासाठी या शासन निर्णयान्वये खालील एक समिती स्थापन करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| १) सचिव (माउतं) सा.प्र.वि | अध्यक्ष |
| २) श्री. संजय उबाळे, सचिव, मुख्य मंत्री कार्यालय | सदस्य |
| ३) श्री. भूषण गगराणी, महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय | सदस्य |
| ४) प्रधान सचिव, वित्त विभाग यांनी नियुक्त केलेले उप सचिवांपेक्षा कमी दर्जा नसलेले वित्त विभागाचे प्रतिनिधी | सदस्य |
| ५) प्रधान सचिव, नियोजन यांनी नियुक्त केलेले उप सचिवांपेक्षा कमी दर्जा नसलेले नियोजन विभागाचे प्रतिनिधी | सदस्य |
| ६) महेश पाठक, उप सचिव, मुख्य सचिव कार्यालय | सदस्य |

एच-२७३(ए)(४५००-६-०१) क्रु. मा. प.

C:\lotus\work\wordpro/ preshasan.~ts

| | |
|---|---|
| ७) श्री. एस.एम.रोम्बावानी, उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग | सदस्य |
| ८) श्री. ए. एन. जाधव, सिस्टम ॲनॅलिस्ट, तंत्रशिक्षण संचालनालय | सदस्य |
| ९) श्री. रुडाल्फ डिसोझा, मे ॲप्टेक लि.मुंबई इलियट ऑटो हाऊस, ५४-ए, सर एम. वसनाजी रोड,अंधेरी (पू.)मुंबई ९३. | सदस्य |
| १०) संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय | सदस्य सचिव |

२. एजन्सी नेमण्याच्या संकल्पनेला मान्यता देणे, निविदेचे प्रारुप ठरविणे, निविदा देकाराची छाननी करुन अंतिम निविदा मान्य करणे, त्याशिवाय कन्सलटींग एजन्सी नियुक्ती करण्यासंबंधातील इतर सर्व तांत्रिक बाबींचा विचार करणे हया या समितीच्या कार्यकक्षा असतील. आवश्यक तेव्हा समितीचे अध्यक्ष सदरहू समितीच्या बैठका बोलावू शकतील.

३. हा शासन निर्णय उच्चाधिकार समितीच्या कार्यकारी समितीस शासन निर्णय क्रमांक सीओएम १०९८/प्रक्र२१३/९८/३९, दि. १२.१२.१९९८ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( मो. का. भोये )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
राज्यपालांचे सचिव
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा,मुंबई
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
* सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ, सचिवालय (विधान सभा),मुंबई
* सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ
सचिवालय (विधान परिषद), मुंबई
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/लेखाकोष भवन वांद्रे (पूर्व), मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
सर्व मंत्रालयीन विभाग
मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती (दोन प्रती)
* पत्राने.